आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळांमध्ये अनलॉक लर्निंग उपक्रम राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - अआशा - २०२०/प्र.क्र.७९/का.११**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-**

१. उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.भांखसं-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४ दि. १ डिसेंबर, २०१६.

२. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.शाआशा-२०१५/प्र.क्र.३४१ (भाग१)/का.१३ दि. १५ जून, २०१७.

३. आयुक्त, आदिवासी विकास यांचे क्र. शाआशा- २०२०/प्र.क्र. ७/क.६(५), दि. १९ ऑगस्ट,२०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -**

आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळा निवासी असल्यामुळे कोरोना संकटाच्या पार्श्वभूमीवर त्यासुरू करण्यात आलेल्या नाहीत. महाराष्ट्रात कोव्हीड १९ चा प्रादुर्भाव जास्त असल्यामुळे निवासी आश्रमशाळेत पहिल्या सत्रात अनौपचारिक शालेय शिक्षण सुरु ठेवणे आव्हानात्मक आहे. विद्यार्थ्यांना शाळेपर्यंत आणण्याऐवजी शिक्षण विद्यार्थ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी “नियोजन आराखडा” तयार करुन शिक्षणाच्या मूलभुत संकल्पना अंमलात आणण्यासाठी नियोजन केले आहे. हा आराखडा परिपूर्ण पध्दतीने आंमलात यावा यासाठी शैक्षणिक, प्रशासकीय, आर्थिक आणि अंमलबजावणी विषयक घटकांवर काम करणाऱ्या ११ उपसमित्यांच्या मदतीने संपूर्ण नियोजनाची प्रक्रिया पूर्ण करण्यात आली आहे. आदिवासी आश्रम शाळांमध्ये दर्जेदार शैक्षणिक प्रयोग केलेले अधिकारी, मुख्याध्यापक, शिक्षक आणि शैक्षणिक अभ्यासक यांचा या ११ समित्यांमध्ये समावेश करण्यात आला होता. १ जुन ते ११ जुन या दरम्यान दैनंदिन व्हिडीओ कॉन्फरसींगव्दारे सविस्तर चर्चा व नियोजन केले. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या शाळा बंद पण शिक्षण चालू या घोषणेस अनुसरुन व मा.मंत्रिमहोदय, आदिवासी विकास विभाग यांनी “आदिवासी विकास विभागाच्या शाळांमधील विद्यार्थ्यांना ऑफलाइन शिक्षण घरपोच देणार” या घोषणेला अनुसरुन आयुक्तालयातर्फे “अनलॉक लर्निंग” हा पर्यायी शिक्षण उपक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा,एकलव्य निवास शाळा व नामांकित शालेतील विद्यार्थ्यांचे पहिल्या सत्रात शिक्षण पर्यायी व्यवस्थेद्वारे सुरु ठेवण्याच्या अनुषंगाने विद्यार्थ्यांना शाळेपर्यंत आणण्या ऐवजी शिक्षण विद्यार्थ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी अनलॉक लर्निंग या प्रकल्पास व त्यासाठी येणा-या शैक्षणिक खर्चाच्या

रू **२८,५९,५६,४००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी एकोणसाठ लक्ष छप्पन हजार चारशे फक्त)** इतक्या रक्कमेच्या अंदाजीत खर्चास विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कार्यपुस्तिका व कृतिपुस्तिकांच्या छपाईसाठी तसेच विध्यार्थ्यांना द्यावयाचे शैक्षणिक किट खरेदीसाठी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची नियम पुस्तिका" याबाबत उद्योग उर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६ मध्ये व या विभागाच्या दि. १५ जून, २०१७ च्या शासन निर्णयामध्ये नमुद केलेल्या विहित कार्यपद्धतीचे अनुपालन करण्यात यावे.

३. सर्व प्रकल्पांमध्ये समानता राहण्यासाठी कार्यपुस्तिका व कृतिपुस्तिकांच्या तसेच विध्यार्थ्यांना द्यावयाचे शैक्षणिक किटमधील वस्तु, त्यांचे परिमान, स्पेशिफीकेशन व दर्जा आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी निश्चित करुन द्यावा.

४. कार्यपुस्तिका व कृतिपुस्तिकांच्या छपाई तसेच विध्यार्थ्यांना द्यावयाचे शैक्षणिक किट यांची खरेदी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्या अध्यक्षतेखाली दि. १५ जून, २०१७ च्या शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या समितीकडून करण्यात यावी.

५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. १/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा याची खात्री खरेदी समितीने करावी.

६. कार्यपुस्तिका व कृतिपुस्तिकांच्या छपाईसाठी तसेच विध्यार्थ्यांना द्यावयाचे शैक्षणिक किट खरेदीसाठी मागविण्यात येणाऱ्या निविदेला सर्वदूर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

७. निविदा मागविताना अनावश्यक / जाचक अटी टाकू नयेत व सर्व निविदा प्रक्रिया पारदर्शकपणे राबविण्यात यावी.

८. विद्यार्थ्यांना तातडीने साहित्य उपलब्ध होणेसाठी सदरची प्रक्रिया तात्काळ राबविण्यात यावी व सदर उपक्रमाच्या अंमलबजावणीचा आढावा प्रकल्प अधिकारी,अपर आयुक्त व आयुक्त स्तरावर प्रत्येक आठवड्यात घेण्यात यावा.

९. कार्यपुस्तिका व कृतिपुस्तिकांच्या छपाईसाठी तसेच विध्यार्थ्यांना द्यावयाचे शैक्षणिक किट खरेदीसाठी येणारा खर्च संबंधित योजनेखालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५०६/व्यय-१४,दि.७ ऑक्टोबर,२०२० रोजीच्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२०१००९१५१६३९७७२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan
Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, serialNumber=e5bb5862d0e131a274d92f7a1acef953e01301c1b0fb615dc6cce4812bded257, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2020.10.09 15:18:30 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीस्तव,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
३. मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
७. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक.
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नागपूर/नाशिक/ठाणे/अमरावती.
९. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व).
११. निवडनस्ती, कार्यासन क्र.१३ अ.

# विवरणपत्र

**(१) शासकीय आश्रमशाळा- एकूण शाळा- ४९९ - लेखा शिर्ष - डी ७३४(२१) साधनसामुग्री**

| अ.क्र. | विद्यार्थी संख्या | प्रतिविद्यार्थी साहित्य | प्रतिविद्यार्थी एकूण रक्कम | निधी आवश्यकता |
|---|---|---|---|---|
| १ | १८३५४६ | शैक्षणिक किट | ५०० | ९१७७३००० |
| २ | | कार्यपुस्तिका | ६० | ११०१२७६० |
| ३ | | कृतीपुस्तिका | ३० | ५५०६३८० |
| ४ | | अनुषंगिक खर्च | १० | १८३५४६० |
| **एकूण** | | | | **११०१२७६००** |

**(२) अनुदानित आश्रमशाळा - एकूण शाळा -५३९ लेखा शिर्ष - २ २२५ एफ १२९ (३१ सहायक अनुदान)**

| अ .क्र. | विद्यार्थी संख्या | प्रतिविद्यार्थी साहित्य | प्रतिविद्यार्थी एकूण रक्कम | निधी आवश्यकता |
|---|---|---|---|---|
| १ | २३४४२२ | शैक्षणिक किट | ५०० | ११७२११००० |
| २ | | कार्यपुस्तिका | ६० | १४०६५३२० |
| ३ | | कृतीपुस्तिका | ३० | ७०३२६६० |
| ४ | | अनुषंगिक खर्च | १० | २३४४२२० |
| **एकूण** | | | | **१४०६५३२००** |

**(३) नामांकित आश्रमशाळा - एकूण शाळा -१७१ लेखा शिर्ष - २२२५ सी९९ (३१ सहायक अनुदान)**

| अ.क्र. | विद्यार्थी संख्या | प्रतिविद्यार्थी साहित्य | प्रतिविद्यार्थी एकूण रक्कम | निधी आवश्यकता |
|---|---|---|---|---|
| १ | ५३६२६ | शैक्षणिक किट | ५०० | २६८१३००० |
| २ | | कार्यपुस्तिका | ६० | ३२१७५६० |
| ३ | | कृतीपुस्तिका | ३० | १६०८७८० |
| ४ | | अनुषंगिक खर्च | १० | ५३६२६० |
| **एकूण** | | | | **३२१७५६००** |

**(४) एकलव्य आश्रमशाळा - एकूण शाळा -२५ - लेखा शिर्ष (२२२५ २५८७) ३१ सहायक अनुदान**

| अ.क्र. | विद्यार्थी संख्या | प्रतिविद्यार्थी साहित्य | प्रतिविद्यार्थी एकूण रक्कम | निधी आवश्यकता |
|---|---|---|---|---|
| १ | ५००० | शैक्षणिक किट | ५०० | २५००००० |
| २ | | कार्यपुस्तिका | ६० | ३००००० |
| ३ | | कृतीपुस्तिका | ३० | १५०००० |
| ४ | | अनुषंगिक खर्च | १० | ५०००० |
| **एकूण** | | | | **३००००००** |